**सर्वसाधारण जिल्हा वार्षिक योजनेतील केंद्र पुरस्कृत योजनेतील राज्य हिश्श्याच्या तरतुदीचे वाटप.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन परिपत्रक क्र. डिएपी-१०१७/प्र.क्र.४७/का.१४८१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक: ०७ मार्च, २०१७**

वाचा:- १. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. जिवायो-१००७/प्र.क्र.३९/का.१४४४, दि.१६/२/२००८.
२. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. डिएपी-१०१५/प्र.क्र.७०/का.१४८१, दि.२५/३/२०१५.
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०/४/२०१६.

**परिपत्रक**

सर्वसाधारण जिल्हा वार्षिक योजनेतील केंद्र पुरस्कृत योजनेतील राज्य हिश्श्याची तरतूद जिल्हा वार्षिक योजनेचा आराखडा तयार करतांना संबंधित प्रशासकीय विभागांकडून माहिती घेऊन सर्व जिल्हाधिकारी यांना कळविण्याची कार्यवाही नियोजन विभागाकडून केली जाते. आजमितीस सोबतच्या जोडपत्र-१ मध्ये नमूद केलेल्या ६ केंद्र पुरस्कृत योजनांच्या राज्य हिश्श्याच्या तरतुदीचे वितरण जिल्हा वार्षिक योजनेतून केले जाते.

२. केंद्र पुरस्कृत योजनांतील राज्य हिश्श्याच्या तरतुदीचे वितरण करतांना ज्या प्रमाणात केंद्र शासनाचा हिस्सा प्राप्त होईल, त्याच प्रमाणात जिल्हा योजनेचा निधी संबंधित कार्यान्वयीन यंत्रणांना वितरीत करण्याचे निदेश वर नमूद केलेल्या दि.१६/२/२००८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद २.७ मध्ये देण्यात आले आहेत. वित्त विभागाकडूनही प्रत्येक आर्थिक वर्षाच्या सुरुवातीस महाराष्ट्र विनियोजन अधिनियम संमत झाल्यावर त्यातील निधी वितरणाच्या मार्गदर्शक सूचना देण्यात येतात. याही वर्षी अशा सूचना वर नमूद केलेल्या दि.२०/४/२०१६ च्या परिपत्रकान्वये देण्यात आल्या असून, या परिपत्रकातील परिच्छेद १८ मध्ये राज्य शासनाचा समरुप हिस्सा वितरीत करण्यापूर्वी केंद्र शासनाकडून निधी प्राप्त झाल्याची खात्री करुन घेणे अनिवार्य करण्यात आले आहे. सबब, केंद्र पुरस्कृत योजनांसंदर्भात केंद्र शासनाकडून संबंधित कार्यान्वयीन यंत्रणांना निधी प्राप्त झाल्याची खात्री प्रथम करुन घेण्यात यावी व ज्या प्रमाणात निधी प्राप्त झाला आहे, त्याच प्रमाणात (दि.१६/२/२००८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद २.७ मध्ये दिलेल्या उदाहरणानुसार) जिल्हा वार्षिक योजनेत अर्थसंकल्पित केलेल्या राज्य हिश्श्याच्या तरतुदीपैकी निधी कार्यान्वयीन यंत्रणांना वितरीत करण्यात यावा. केंद्र शासनाकडून प्राप्त निधी कमी प्रमाणात प्राप्त झाल्यास अथवा प्राप्त न झाल्यास, साहजिकच जिल्हा वार्षिक योजनेत बचत संभावेल. अशी बचत जिल्हा योजनेतील गाभा क्षेत्रासाठी पुनर्विनियोजनाने जिल्हा नियोजन समितीच्या मान्यतेने

वापरण्याची मुभा जिल्हाधिकारी यांना वर नमूद केलेल्या दि.२५/३/२०१५ च्या शासन निर्णयान्वये या आधीच देण्यात आली आहे.

३. वरील तरतुदीचे कटाक्षाने पालन होईल, याची सर्व जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती यांनी खबरदारी घ्यावी. या संदर्भात शासनाच्या कोणत्याही प्रशासकीय विभागाकडून केंद्र हिस्सा प्राप्त झाला नसतांना राज्य हिस्सा वितरीत करण्याबाबतचे निदेश प्राप्त झाल्यास, अशी कार्यवाही करण्यापूर्वी नियोजन विभागाची त्यास सहमती घेण्यात यावी.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०१७०३०७१७४११८८५१६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Satish J Moghe

Digitally signed by Satish J Moghe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6230073c6c2b69dbf76e5210974f85eec0496e45eb4319228925521689fc99e6, cn=Satish J Moghe
Date: 2017.03.08 17:16:14 +05'30'

**( स. ज. मोघे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संबंधित विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
२. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, सर्व
३. जिल्हाधिकारी, सर्व
४. उपायुक्त (नियोजन), आयुक्त कार्यालय, सर्व
५. जिल्हा नियोजन अधिकारी, सर्व
६. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक
७. उप सचिव (का.१४८१) यांचे स्वीय सहायक
८. निवड नस्ती (का.१४८१), नियोजन विभाग.

## जोडपत्र- १

## केंद्र पूरस्कृत योजनांची यादी

| अ.क्र. | विभागाचे नांव | जिल्हा योजनेतील केंद्र पुरस्कृत योजनेचे नांव |
|---|---|---|
| १ | कृषी विभाग | राष्ट्रीय शाश्वत कृषि अभियान- शेतीवरील पाणी व्यवस्थापन- उप अभियान (सन २०१६-१७ पासून नवीन नाव- प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना- प्रती थेंब- अधिक पीक) (सुक्ष्म सिंचन योजना) |
| २ | कृषी विभाग | राष्ट्रीय अभियान- तेलबीया व तेलताड लघुभियान एक-तेलबीया/ तीन (वृक्ष आधारीत उपअभियान) (एकात्मिक तेलबीया उत्पादन कार्यक्रम) |
| ३ | कृषी विभाग | राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्यासाठी अर्थसहाय्य- उपअभियान (राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्यासाठी अर्थसहाय्य) |
| ४ | ग्राम विकास विभाग | जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा- प्रशासनला अनुदान |
| ५ | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | स्वच्छ भारत मिशन (शौचालय बांधकाम) (निर्मल भारत अभियान) |
| ६ | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | राष्ट्रीय ग्रामीण पेयजल योजना |